**महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४ मधील परिशिष्ठ ४२ खालील वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.टेमघ-१०१६/प्र.क्र. ७६२/१६/मोप्र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- २२ डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u> : शासन निर्णय क्र. विअसु¬२०१५/प्र.क्र. २१८/इमारती-२,सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.१६ डिसेंबर २०१५

<u>प्रस्तावना:-</u>

सार्वजनिक बांधकाम व पाटबंधारे विभागाकडे सोपविलेली कामे सुलभरितीने पार पाडणे शक्य व्हावे याकरिता या विभागांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय अधिका-यांना सार्वजनिक बांधकाम नियमावलीच्या परिशिष्ट ४२ मध्ये दर्शविल्याप्रमाणे विविध वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. परिशिष्ठ ४२ मध्ये अंतर्भूत केलेले अधिकार हे दिनांक ३१ मार्च १९८४ पर्यंत वाढविण्यात आलेले अधिकार विचारात घेतले होते. यापैकी काही अधिकारामध्ये सन १९८९ पर्यंत आवश्यकतेनुसार सुधारीत करण्यात आलेले आहेत. तसेच वित्तीय अधिकार दिनांक १८ नोव्हेंबर १९९६ च्या शासन निर्णयाव्दारे सुधारीत करण्यात आलेले आहेत. तद्नंतर सर्वसाधारणपणे बाजारभावात विशेषत: बांधकाम साहित्यांच्या किंमतीत व मजूरीत मोठया प्रमाणात वाढ झालेली असल्याने संदर्भाधीन शासन निर्णयाव्दारे वित्तीय अधिकारात सुधारणा करण्यात आलेली आहे. सदर वित्तीय अधिकारात रुपये १५ कोटी पर्यंत निविदा स्विकारण्याचे अधिकार क्षेत्रिय मुख्य अभियंता यांना व रुपये ३० कोटी पर्यंत संबंधीत प्रशासकीय विभागास तसेच रुपये ३० कोटीवरील पूर्ण अधिकार हे अ. मु. स. (सा. बां. वि.), अ.मु.स. (जलसंपदा) , अ.मु. स. (वित्त), अ.मु. स. (नियोजन) यांच्या समितीस प्रदान करण्यात आलेले आहेत.

जलसंपदा विभागाच्या कामांची व्याप्ती पाहता प्रारुप निविदा संचास मान्यता देण्याचे पूर्ण अधिकार पूर्वीप्रमाणेच मुख्य अभियंता यांना असणे गरजेचे आहे. Technical Specifications हा प्रारुप निविदा संचातील महत्वाचा तांत्रिक भाग राहतो. ही Specifications कामनिहाय अशत: बदलू शकतात. तसेच Specifications व Rate analysis यामधील तरतूदी एकमेकास पूरक असणे गरजेचे असते. अंदाज पत्रकास तांत्रिक मान्यता देण्याचे पूर्ण अधिकार मुख्य अभियंता यांना आहेत. त्यामुळे प्रारुप निविदा संचास मान्यता देण्याचे तसेच Contract management मधील सर्व घटक हाताळण्याचे पुर्ण अधिकार मुख्य अभियंता यांना असणे गरजेचे आहे. संदर्भाधीन शासन निर्णय काढतानांही हीच धारणा अभिप्रेत होती. तथापि ती उपरोक्त शासन निर्णयात ध्वनीत झालेली नाही.

संदर्भिय शासन निर्णयाचे पार्श्वभूमीवर रु. १५ कोटीवरील किंमतीच्या प्रारुप निविदा संचास कोणत्या स्तरावरुन मान्यता द्यावी याबाबत क्षेत्रिय अधिका-यांमध्ये संभ्रम निर्माण झाल्याचे निदर्शनास आले. त्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागास संदर्भाधिन शासन निर्णयामध्ये सुधारणा करुन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यासाठी विनंती करण्यात आली होती.

याबाबत "सदयस्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागाअंतर्गत सर्व बांधकामाच्या प्रारुप निविदा प्रपत्रांना मंजूरी देण्याचे अधिकार क्षेत्रीय स्तरावरुन विविध अभियंत्याना प्रदान करण्यात आले आहेत. प्रारुप निविदास मंजूरी देण्याचे संपूर्ण अधिकार (अमर्याद रक्कमेचे) मुख्य अभियंता यांना प्रदान करण्यात आले आहेत", असे सार्वजनिक बांधकाम विभागाने अभिप्राय नोंदविलेले आहेत. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक:-**

वित्तीय अधिकारात सुधारणा बाबतचा शासन निर्णय क्र. विअसु-२०१५/प्र.क्र. २१८/इमारती-२,सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.१६ डिसेंबर २०१५ अन्वये रुपये १५ कोटी पर्यंत निविदा स्विकारण्याचे अधिकार क्षेत्रिय मुख्य अभियंता यांना व रुपये ३० कोटी पर्यंत संबंधीत प्रशासकीय विभाग तसेच रुपये ३० कोटीवरील पूर्ण अधिकार हे अ. मु. स. (सा. बां. वि.), अ.मु.स. (जलसंपदा), अ.मु. स. (वित्त), अ.मु. स. (नियोजन) यांच्या समितीस प्रदान करण्यात आलेले आहेत. तथापि, प्रारुप निविदा संचास मान्यता देण्याचे अधिकार कोणाला आहेत, याबाबत स्पष्टता नाही. त्या अनुषंगाने प्रारुप निविदा प्रपत्रांना मंजूरी देण्याचे संपूर्ण अधिकार (अमर्याद रक्कमेचे) क्षेत्रिय मुख्य अभियंता यांना प्रदान करण्यात येत आहेत. तसेच क्षेत्रीय अभियंत्याना (कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता) त्यांना असलेल्या निविदा स्वीकारण्याच्या अधिकाराच्या किंमतीपर्यंतच्या प्रारुप निविदा प्रपत्राला मान्यता देण्याचे अधिकार राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२२३१२५१२५४६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijendra Prabhakar Palwankar

Digitally signed by Vijendra Prabhakar Palwankar
DN: CN = Vijendra Prabhakar Palwankar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2016.12.23 12:58:42 +05'30'

**( वि.प्र.पालवणकर )**
**कार्यासन अधिकारी,जलसंपदा विभाग**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा)यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा)यांचे स्वीय सहायक.
५) मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व)
६) प्रधान सचिव (ज.स.प्र. व विकास) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
७) सचिव (ज.सं. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) महालेखापाल १ व २ महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
९) सर्व सह सचिव, उप सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०) संचालक,लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) आ.वि.स. व उ.स., जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१३) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१४) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१५) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
१६) मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.